**मुबंई शहरातील उपकरप्राप्त इमारतींच्या पुनर्विकासासाठी बृहन्मुंबई महानगरपालिकेने बांधकाम करण्यास परवानगी (Commencement Certificate) दिल्याच्या दिनांकापासून उपकरातून सूट देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## गृहनिर्माण विभाग
### शासन निर्णय क्रमांकः दुऊसु-२०१३/प्र.क्र.१३९/दुवपु-१

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २०.०२.२०१९.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास अधिनियम, १९७६ च्या कलम ८३ मध्ये विवक्षित इमारतींना व जमिनींना उपकर देण्यापासून सूट देण्याबाबतची तरतूद विहित करण्यात आलेली आहे. या कलमाच्या पोटकलम (१) (प) मध्ये मुंबई महानगरपालिकेकडून प्रमाणित केल्याप्रमाणे पुनर्रचना ठरेल अशा दुरुस्त्या करण्यात आलेल्या इमारतींना उपकरातून सूट देण्याबाबतची तरतूद आहे. तथापि, अशा इमारतींना उपकरातून सूट देताना ती केव्हापासून/कोणत्या दिनांकापासून देण्यात यावी, याबाबत उपरोक्त कलम ८३ मध्ये स्पष्ट उल्लेख नसल्याने, यासंदर्भात असलेली संदिग्धता दूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत विधी व न्याय विभागाकडून घेण्यात आलेल्या अभिप्रायास अनुसरुन, वरील संदिग्धता दूर करण्याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतलेलाआहे.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास अधिनियम, १९७६ च्या कलम ८३ च्या पोटकलम (१) (प) मध्ये मुंबई महानगरपालिकेकडून प्रमाणित केल्याप्रमाणे पुनर्रचना ठरेल अशा दुरुस्त्या करण्यात आलेल्या इमारतींना उपकरातून सूट देण्याची तरतूद आहे. मुंबई शहरातील उपकरप्राप्त इमारतीच्या पुनर्विकासासाठी बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत जेव्हा बांधकाम करण्यास परवानगी देण्यात येते तेव्हांच त्या इमारतीची दुरुस्ती ही, त्या इमारतीची पुनर्रचना ठरणारी असते. ही बाब व कलम ८३ च्या पोट कलम (१) (प) मधील तरतूद विचारात घेता, मुंबई शहरातील उपकरप्राप्त इमारतींच्या पुनर्विकासासाठी बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत ज्या दिनांकास बांधकाम करण्यास परवानगी (Commencement Certificate) दिली असेल/देण्यात येईल, त्या दिनांकापासून संबंधित उपकरप्राप्त इमारतीची उपकर वसूली थांबविण्यात यावी व त्या दिनांकापासून ती मालमत्ता/इमारत बिगर उपकरप्राप्त (Decess) झाली असे समजण्यात यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२२०१३०७३३६७०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramchandra Dhanawade

Digitally signed by Ramchandra Dhanawade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Housing Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cf4fd1e4249e6612552db1552e149b0688899cac7ecc37ca9fbf60ec7d9103d6, serialNumber=5b10ebd8bee2e77f1e579c83aa5378f02ae01b1765ccdd10f83cb76cd8bbe016, cn=Ramchandra Dhanawade
Date: 2019.02.20 13:09:28 +05'30'

**(रा. कों. धनावडे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२. सर्व सन्माननीय विधासनसभा/विधानपरिषद सदस्य व संसद सदस्य.
३. प्रधान सचिव, नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, महानगरपालिका भवन, फोर्ट, मुंबई ४०० ००१.
५. उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, वाद्रे(पु.), मुंबई ५१.
६. मुख्य अधिकारी, मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ, गृहनिर्माण भवन, वाद्रे(पु.), मुंबई ५१.
७. मुख्य लेखा अधिकारी, मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ, गृहनिर्माण भवन, वाद्रे(पु.), मुंबई ५१.
८. निवड नस्ती, कार्यासन दुवपू-१.